महाराष्ट्र लेखा लिपिक परीक्षा उत्तीर्ण
झालेल्या कोषागार लिपिकांना कालबध्द
पदोन्नत्ती योजनेंतर्गत उपलेखापाल पदाची
वेतनश्रेणी लागू करणेबाबत.

महाराष्ट्र शासन
वित्त विभाग
शासन निर्णय, क्रमांक : सेवाप्र - १२.०२ / प्र. क्र. १५८ / कोषा. प्रशा. ४
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक २६ ऑक्टोबर, २००४

शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्रमाक : एसआरव्ही - १०९५ / प्र. क्र. १ / ९५ / बारा, दिनांक ८ जून, १९९५ नुसार कालबध्द पदोन्नती योजनेंतर्गत, लेखा व कोषागारे संचालनालयाच्या अधिनस्त असलेल्या जिल्हा कोषागार / उप कोषागार कार्यालयातील महाराष्ट्र लेखा लिपिक परीक्षा उत्तीर्ण झालेल्या व १२ वर्षाची नियमित सेवा पूर्ण होऊनही उपलेखापाल पदावरील पदोन्नतीपासून वंचित राहिलेल्या कोषागार लिपिकांना वरिष्ठ लिपिक पदाच्या वेतनश्रेणीऐवजी उपलेखापाल पदाची वेतनश्रेणी लागू करण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. याबाबत सखोल विचारांती पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

## **शासन निर्णय**

लेखा व कोषागारे संचालनालयाच्या अधिनस्त असलेल्या जिल्हा कोषागार / उप कोषागार कार्यालयातील महाराष्ट्र लेखा लिपिक परीक्षा उत्तीर्ण झालेल्या व १२ वर्षाची नियमित सेवा पूर्ण झालेल्या, उपलेखापाल पदावरील पदोन्नतीपासून वंचित राहिलेल्या कोषागार लिपिकांना शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक : एसआरव्ही - १०९५ / प्र. क्र. १ / ९५ / बारा, दिनांक ८ जून, १९९५ नुसार कालबध्द पदोन्नती योजनेच्या अंमलबजावणीच्या दिनांकापासून वरिष्ठ लिपिक पदाच्या ( जुनी वेतनश्रेणी रु. १२०० - ३० - १५६० - द. रो. ४० - २०४० व सुधारित वेतनश्रेणी रु. ४,००० - १०० - ६,००० ) वेतनश्रेणीऐवजी उपलेखापाल पदाची ( जुनी वेतनश्रेणी रु. १४०० - ४० -१६०० - ५० - २३०० - द. रो. ६० - २६०० नवीन वेतनश्रेणी रु. ५,००० - १५० - ८,००० ) वेतनश्रेणी खालील कार्यपध्दतीप्रमाणे मंजूर करण्यास शासन मान्यता देत आहे.

अ ) कालबध्द पदोन्नती योजनेंतर्गत वरीलप्रमाणे उपलेखापाल पदाची वेतनश्रेणी लागू करताना संबधित कर्मचाऱ्याची १२ वर्षाची नियमित सेवा पूर्ण झाल्याचा दिनांक व महाराष्ट्र लेखा लिपिक परीक्षा उत्तीर्ण झाल्याचा दिनांक यापैकी जो उशीरा असेल तो दिनांक धरण्यात यावा.

ब ) महाराष्ट्र लेखा लिपिक परीक्षा उत्तीर्ण असलेल्या कोषागार लिपिकांना कालबध्द पदोन्नती योजनेंतर्गत उपलेखापाल पदाची वेतनश्रेणी शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक : डीएटी - १०६४ / ५८४ / सी - १२, दिनांक १ फेब्रुवारी, १९६५ मधील तरतुदींच्या आधारे अनुज्ञेय राहील.

क ) प्रस्तुत कालबध्द योजनेंतर्गत महाराष्ट्र लेखा लिपिक परीक्षा उतीर्ण झालेल्या कोषागार / उप कोषागारातील कनिष्ठ लिपिक संवर्गातील कर्मचाऱ्यांना सदरहू परीक्षा उत्तीर्ण होईपर्यंतच्या दिनांकाचा किंवा ही परीक्षा उत्तीर्ण होण्यापासून सूट मिळण्याच्या दिनांकाचा विकल्प देता येईल.

ड ) वरील " अ " प्रमाणे १२ वर्षाची नियमित सेवा पूर्ण झाल्यानंतर तसेच महाराष्ट्र लेखा लिपिक परीक्षा उत्तीर्ण झालेल्या कोषागार लिपिकांना शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक : पीएचवाय - १०८२ / सीआर - ११०० ( एक ) / एसईआर -३, दिनांक ६ नोव्हेंबर, १९८४ प्रमाणे विकल्प देण्याचा पर्याय अनुज्ञेय राहील.

हे आदेश दिनांक १ ऑक्टोबर, १९९४ पासून अंमलात येतील, दिनांक १ ऑक्टोबर, १९९४ किंवा नंतर आणि हे आदेश निर्गमित होण्याच्या दिनांकापर्यंत कालबध्द पदोन्नती प्राप्त झालेल्या व्यक्तींना जरुर तो विकल्प देण्यासाठी या आदेशाच्या दिनांकापासून तीन महिन्यांचा कालावधी देण्यात येत आहे. तसेच ज्या व्यक्ती यानंतर कालबध्द पदोन्नतीस पात्र होतील अशा व्यक्तीना सुध्दा त्यांच्या कालबध्द पदोन्नतीच्या दिनांकापासून या आदेशानुसार वेतननिश्चितीचा लाभ देण्यासाठी एका महिन्याचा कालावधी देण्यात यावा. दोन्ही प्रकरणामध्ये **एकदा दिलेला विकल्प अखेरचा समजण्यात येईल.** त्याचप्रमाणे नियमित पदोन्नती नाकारलेल्या कर्मचाऱ्यास या योजनेचा लाभ मिळू शकणार नाही.

हे आदेश वित्त विभाग अनौ. संदर्भ क्रमांक : ८५ / सेवा - ३, दिनांक १७ जुलै, २००४ अन्वये देण्यात आलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

क. कि. पारकर
शासनाच्या अवर सचिव

प्रत

महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता )-१, महाराष्ट्र, मुंबई ( ५ प्रती )
महालेखापाल ( लेखा परीक्षा )-१, महाराष्ट्र, मुंबई ( ५ प्रती )
महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता )-२, महाराष्ट्र, नागपूर ( ५ प्रती )
महालेखापाल ( लेखा परीक्षा )-२, महाराष्ट्र, नागपूर ( ५ प्रती )
संचालक, लेखा व कोषागारे संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई-४०० ०२१ ( ५ प्रती )
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
उप संचालक, लेखा व कोषागारे, पुणे / नाशिक / नागपूर / औरंगाबाद / अमरावती / कोकण विभाग
सर्व जिल्हा कोषागार / उप कोषागार अधिकारी,
कार्यासन अधिकारी ( सेवा - ३ ), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
कार्यासन अधिकारी, प्रशासन-४ /अर्थसंकल्प ७ / कोषा. प्रशा. १ / २ / ३ वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
निवड नस्ती / शासन निर्णय संग्रह ( कोषा- प्रशा.४ )